**राज्यातील ‘क’ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्याचे निकष निश्चित करणे व इतर वैशिष्ट्यपूर्ण पर्यटन स्थळी मूलभूत सुविधांचा विकास करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी -२०२०/१२/प्र.क्र.८१२/पर्यटन**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १२ जुलै, २०२३.

**संदर्भ :** १. शासन निर्णय क्र. गृह विभाग (पर्यटन),एमटीसी-१०९६/१२/प्र.क्र.५२३/पर्यटन, दि.०८/११/१९९६
२. शासन निर्णय क्र.टिडीएम-२०१४/८/प्र.क्र.४६३/पर्यटन, दि.०४/११/२०१०.
३. शासन निर्णय क्र.टिडीसी -२०११/१२/प्र.क्र.८५५/पर्यटन, दि.१६/०१/२०१२.

**प्रस्तावना :-**

प्रादेशिक पर्यटन विकास योजनेची अंमलबजावणी प्रभावीपणे करणे व निधी वितरीत करणे याबाबत राज्यातील पर्यटन स्थळांची निवड व त्यांचे ‘अ’ ‘ब’ व ‘क’ चे वर्गीकरण करण्याबाबत संदर्भ क्र.१ (क्र. गृह विभाग (पर्यटन),एमटीसी-१०९६/१२/प्र.क्र.५२३/पर्यटन, दि.०८/११/१९९६) चा शासन निर्णयसंदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आला. तद्नंतर संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील ‘ब’ व ‘क’ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्याबाबतचे अधिकार जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समितीस प्रदान करण्यात आले आहेत. तथापि, एखाद्या स्थळास ‘क’ वर्ग पर्यटन स्थळ घोषित करण्याबाबतचे निकष निश्चित करण्यात आले नव्हते. राज्यातील ‘क’ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्यासाठीचे निकष निश्चित करणे तसेच, ‘क’ वर्ग पर्यटन स्थळे घोषित करण्याबाबत निर्णय शासन स्तरावरुन घेण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**१) ‘क’ वर्ग पर्यटन स्थळ घोषित करण्याचे निकष निश्चित करण्याबाबत :-**

राज्यातील "क" वर्ग पर्यटनस्थळे घोषित करण्यासाठी खालीलप्रमाणे निकष निश्चित करण्यात येत आहेत:-

१. ‘क’ वर्ग पर्यटनस्थळ घोषित करावयाचे प्रस्तावित पर्यटनस्थळ जिल्हास्तरावरील महत्वाचे व प्रसिध्द पर्यटन क्षेत्र असले पाहिजे.
२. प्रस्तावित पर्यटन स्थळास दरवर्षी किमान १ लक्ष पर्यटकांनी भेट दिलेली असावी. तसेच, एखाद्या स्थळी पर्यटकांच्या भेटीची मागील ३ वर्षांची सरासरी किमान १ लक्ष पर्यटक एवढी असावी. पर्यटकांची संख्या पोलीस अधिक्षक कार्यालयाकडुन प्रमाणित करण्यात आली असली पाहिजे.
३. प्रस्तावित पर्यटन स्थळास ऐतिहासिक, नैसर्गिक किंवा भौगोलिक महत्व असले पाहिजे.
४. प्रस्तावित पर्यटन स्थळाला विशेष भौगोलिक वैशिष्ट्य (उदा.लोणार सरोवर, कातळशिल्प, गरम पाण्याचे कुंडाचे क्षेत्र, बारव (Step well) जैवविविधता हॉट स्पॉट, वारसा स्थळ, अमूर्त (Intangible) हेरिटेज स्थळ विशेष इ.) असणे आवश्यक आहे.

५. कोणत्याही पर्यटन, तिर्थक्षेत्र, यात्रास्थळी, जत्रास्थळी एकाच प्रासंगिक यात्रेसाठी येणा-या पर्यटकांची संख्या ‘क’ वर्ग पर्यटन दर्जा देण्यास पुरेशी नाही. तेथे इतर दिवशी येणाऱ्या पर्यटकांची संख्या ही विचारात घेणे अपेक्षित आहे.
६. एखाद्या स्थळाला ‘क’ वर्ग पर्यटन स्थळाचा दर्जा देण्यापुर्वी त्या ठिकाणी किमान मुलभूत सोयी-सुविधा (पोहच रस्ता, पिण्याच्या पाण्याची सोय, घनकचरा, सांडपाणी व्यवस्थापन इ.) उपलब्ध असल्याची खातरजमा करण्यात यावी.
७. ‘क’ वर्ग पर्यटन स्थळ घोषित करण्याच्या प्रस्तावासोबत जागेची मालकी, उपलब्ध क्षेत्र इत्यादी बाबत स्पष्ट माहिती देण्यात यावी.
८. धार्मिक/ नैसर्गिक / ऐतिहासिक / वन पर्यटन इ. पर्यटन स्थळाची वर्गवारी करण्यात यावी व पर्यटनदृष्ट्या विकसित होण्याची क्षमता असणा-या स्थळांस निधी देण्याबाबत प्राधान्याने विचार करण्यात येईल.

**२) इतर वैशिष्ट्यपूर्ण पर्यटन स्थळांचा विकास :-**

जिल्ह्यातील लहान पर्यटनस्थळी पर्यटकांसाठी मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी जिल्हा नियोजन समितीच्या माध्यमातून निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. हे पहाता, जिल्ह्यातील विधानसभा क्षेत्रनिहाय एक किंवा दोन वैशिष्ट्यपूर्ण पर्यटन स्थळी मूलभूत सुविधा निर्माण होऊन त्या पर्यटन स्थळाचा सुयोग्य विकास व्हावा यादृष्टीने ‘अ’ ‘ब’ किंवा ‘क’ या वर्गवारीमध्ये समाविष्ट नसलेल्या परंतू देश-विदेशातून किंवा इतर राज्यातून मोठ्या संख्येने पर्यटक भेट देतात अशा ऐतिहासिक, भौगोलिक किंवा धार्मिक महत्त्वाच्या पर्यटनस्थळी मूलभूत सुविधा निर्माण करावयाच्या असल्यास संबंधित लोकप्रतिनिधींनी सुचविल्यानुसार जिल्हाधिकाऱ्यांनी प्रत्येक विधानसभा क्षेत्रातील एक किंवा दोन वैशिष्ट्यपूर्ण पर्यटन स्थळांचा विकास करण्यासाठी रु.५ कोटीच्या मर्यादेत प्रस्ताव पर्यटन संचालनालयामार्फत शासनाकडे प्रादेशिक पर्यटन विकास समितीपुढे सादर करण्यासाठी पाठवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सकेतांक २०२३०७१३१३०५०७७९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MADAN GIRJU SONDE

Digitally signed by MADAN GIRJU SONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=5f2ca7eecbf1d69ba49909a95bb51f6144c31e6511072bd3c3e0545414f2af5e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E04F8247FBE91B9ABDD8D54046F658559E3B3D749A417EEB1DA2AB279A9BE388, cn=MADAN GIRJU SONDE
Date: 2023.07.14 12:07:01 +05'30'

**( मदन सोंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधान भवन, मुंबई.
७. सर्व विधानसभा, विधानपरिषद सदस्य
८. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
११. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. सर्व विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१, मुंबई / नागपूर
१५. सर्व मंत्रालयीन विभाग
१६. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी
१७. निवड नस्ती (पर्यटन).